**मराठा आरक्षण संदर्भात मा.मुख्य न्यायमूर्ती श्री दिलीप भोसले (निवृत्त) यांचे अध्यक्षतेखाली गठित मा.न्यायमूर्ती श्री एम.जी. गायकवाड (निवृत्त) व मा.न्यायमूर्ती श्री. संदीप शिंदे (निवृत्त) यांच्या सल्लागार मंडळास मानधन व इतर सोयीसुविधांबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मआसु- २०२३/प्र.क्र.१३७/आरक्षण-५ (१६-क)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०२ एप्रिल,२०२५

**संदर्भ :**

१.सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक मआसु-२०२३/प्र.क्र.०३/१६-क, दि.०८ नोव्हेंबर, २०२३

२. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक मआसु- २०२३/प्र.क्र.१३७/१६-क, दि.४ जानेवारी,२०२४

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र.१ येथिल दि.८.११.२०२३ च्या शासन निर्णयान्वये मराठा आरक्षणासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालय, मा.उच्च न्यायालय व इतर न्यायालयात प्रलंबित असलेल्या प्रकरणांमध्ये शासनास कायदेशीर बाबींसंदर्भात मार्गदर्शनपर सल्ला देण्यासाठी मा.मुख्य न्यायमूर्ती श्री दिलीप भोसले (निवृत्त) यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे सल्लागार मंडळ स्थापन करण्यात आले आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मुख्य न्यायमूर्ती श्री दिलीप भोसले (निवृत्त) | अध्यक्ष |
| २ | मा.न्यायमूर्ती श्री एम.जी. गायकवाड (निवृत्त) | सदस्य |
| ३ | मा.न्यायमूर्ती श्री संदीप शिंदे (निवृत्त) | सदस्य |

२. संदर्भ क्र.२ येथिल दि.४.१.२०२४ च्या शासन निर्णयान्वये सल्लागार मंडळाचे अध्यक्ष व सदस्य यांना मानधन व इतर सोयी सुविधा पुरविण्यात आल्या आहेत. तथापि, सल्लागार मंडळाचे कामकाज नियमित स्वरूपात चालत नसल्याने सल्लागार मंडळाचे अध्यक्ष व सदस्य यांना दरमहा ठोक मानधन न देता तसेच त्यांना दैनंदिन वापराकरीता वाहन उपलब्ध न करता ज्या ज्या वेळी शासनास आवश्यकता भासेल त्या त्या वेळी सल्लागार मंडळाचे अध्यक्ष व सदस्य यांना बैठकीसाठी आमंत्रित करण्यात यावे व त्यासाठी सल्लागार मंडळाचे अध्यक्ष व सदस्य यांना योग्य ते मानधन देण्यात यावे ,अशी विनंती सल्लागार मंडळाच्या अध्यक्षांनी शासनास केली आहे. त्यानुसार संदर्भ क्र.२ येथिल दि.४.१.२०२४ च्या शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे-

**शासन निर्णय :**

सल्लागार मंडळाचे सन्माननीय अध्यक्ष व सदस्य यांना आवश्यकतेनुसार बैठकीस आमंत्रित करण्यात येईल.

२. बैठकीस उपस्थित राहण्यासाठी सल्लागार मंडळाचे सन्माननीय अध्यक्ष व सदस्य यांना योग्य ते मानधन अदा करण्यात येईल.

३. सल्लागार मंडळाच्या सन्माननीय अध्यक्षांना व सदस्यांना द्यावयाचे मानधन तसेच इतर सोयीसुविधांवर येणारा खर्च "मागणी क्रमांक ए-०४, मुख्य लेखा शिर्ष २०५२ सचिवालय-सर्वसाधारण सेवा ०९०- सचिवालय (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग १३ - कार्यालयीन खर्च (२०५२ ००२५) (अनिवार्य)" या लेखाशीर्षाखाली वर्ष २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०२१३४३१७१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RASIK AMBADAS KHADSE

Digitally signed by RASIK AMBADAS KHADSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=41d02a5c663d2c05d362d4847bea4a1874fda4e9cb60284fb102fd7b9b3891b3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A47200A14B42F151489F73F3E47C9E8733991629B2302A3831B945146BE88A80, cn=RASIK AMBADAS KHADSE
Date: 2025.04.02 13:44:09 +05'30'

**( र.अं.खडसे )**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे अमुस/ प्रधान सचिव
३ मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे प्रधान सचिव
४) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव
४) मा.उप मुख्यमंत्री (गृह, विधि व न्याय) यांचे सचिव
५) मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा
७) सर्व विधानसभा सदस्य/ विधानपरिषद सदस्य
८) मा.मुख्य न्यायमूर्ती श्री दिलीप भोसले (निवृत्त)
९) मा.न्यायमूर्ती श्री एम.जी. गायकवाड (निवृत्त)
१०) मा.न्यायमूर्ती श्री संदीप शिंदे (निवृत्त)
११) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
१२) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
१३) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा/विधानपरिषद)
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५) संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य मुंबई.
१६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१७) उप सचिव (कार्या-२५/ कार्या-२६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई